जिल्हा न्यायाधिश-१ व अप्पर सत्र न्यायाधिश,
अहमदपूर, जिल्हा लातूर यांना कार्यालय प्रमुख आणि
आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित
करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
**शासन निर्णय क्र.डीडीओ २०११/३३३/प्र.क्र.५१ /का.१२,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
**दिनांक : २८ एप्रिल, २०११**

**पहा** : १) शासन अधिसूचना, विधी व न्याय विभाग, क्र.सीआरसी २००९/१७१/(३३) का.१२,
दिनांक ०९.०३.२०११
२) जिल्हा न्यायालय, लातूर यांचे पत्र क्र.१६२८/२०११/, दिनांक ०५.०४.२०११

**शासन निर्णय** :

लातूर जिल्हयातील अहमदपूर येथे जिल्हा न्यायाधिश-१ व अप्पर सत्र न्यायाधिश, यांचे न्यायालय अनुक्रमांक १ च्या शासन अधिसूचनेन्वये दिनांक ०९.०३.२०११ पासून कार्यान्वित झालेले आहे. उक्त न्यायालयातील न्यायिक अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन, भत्ते तसेच इतर कार्यालयीन व न्यायालयीन खर्चाची देयके सादर करण्यास व धनादेश वटविण्यास **जिल्हा न्यायाधिश-१ व अप्पर सत्र न्यायाधिश, अहमदपूर,** यांना **"कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी"** म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर आदेश वित्तीय बाबीपुरते मर्यादीत आहेत.

२. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला उप विभाग एक, शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र १०००/प्र.क्र.४६/२००१/विनियम, दि.११ जुलै २००१ मधील अनुक्रमांक ३, नियम क्रमांक २ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( शिरीष संकपाळ )**
**कार्यासन अधिकारी.**

प्रति,

प्रबंधक, उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई (पत्राने),

प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जिल्हा लातूर,
जिल्हा न्यायाधिश-१ व अप्पर सत्र न्यायाधिश, अहमदपूर , जिल्हा लातूर,
महालेखापाल - (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-दोन, नागपूर,
महालेखापाल - (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-दोन, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, लातूर,
उपकोषागार अधिकारी, अहमदपूर, जिल्हा लातूर,
वित्त विभाग (व्यय ६),
विधी व न्याय विभाग, ०७, २४ व २५,
निवड नस्ती.